**श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या अतिरिक्त आयुक्त पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती.**

## महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बीएमसी-२५१५/प्र.क्र.१०५३/नवि-२१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१५.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभागाचे अ.शा.पत्र क्र.एईओ.-१११३/प्र.क्र.१०/२०१३/दहा, दि.०३.०७.२०१३.
२) बृहन्मुंबई महानगरपालिका प्रशासनाचे यांचे क्र. एमएसई/७५५९, दि. २९.७.२०१५. चे पत्र

**शासन निर्णय:-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या बृहन्मुंबई महानगरपालिकेचे “अतिरिक्त आयुक्त” या पदावरील प्रतिनियुक्तीने केलेल्या नेमणुकीसंबंधीची सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्र भाग-१-अ, सर्वसाधारणमध्ये प्रसिध्द करण्यात यावी.

०२. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ५४ च्या पोटकलम-४ अन्वये प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन शासन असे आदेश देत आहे की श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या बृहन्मुंबई महानगरपालिकेकडे अतिरिक्त आयुक्त या पदाच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती सोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” नुसार असतील.

०३. श्री. एस.व्ही.आर.श्रीनिवास (भाप्रसे) यांच्या अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई या पदावरील प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक ४.७.२०१३ ते दिनांक १५.२.२०१५ असा राहील. दिनांक १६.२.२०१५ पासून अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई हे पद भाप्रसे संवर्ग पद झालेले असल्याने त्यानंतरच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती लागू होणार नाहीत.

०४. हा निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ. संदर्भ २९१५/९-अ, दिनांक १४.१०.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०७१६४३३११८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Kharat

Digitally signed by Sakharam Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Kharat
Date: 2015.11.07 16:45:28 +05'30'

**(स.दि.खरात)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. महापौर, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
३. श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, बांद्रा कुर्ला कॉम्पलेक्स, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-९,९-अ, १०) मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (सेवा-२), मंत्रालय, मुंबई.
९. व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
१०. कार्यासन नवि-२१ (निवडसूची करिता)
११. व्यवस्थापक,शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,चर्नीरोड, मुंबई.

यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्र, भाग-१-अ, सर्वसाधारणमध्ये प्रकाशित करावी व छापील अधिसूचनेच्या प्रत्येकी १० प्रती या विभागाला व आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना पाठवाव्यात.

## अधिसूचना

**नगर विकास विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**क्रमांकः बीएमसी-२५१५/प्र.क्र.१०५३/नवि-२१**

तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१५.

मुंबई महानगरपालिका अधिनियम (१८८८ चा मुंबई III) मधील कलम ५४ च्या पोटकलम ४ अन्वये प्राप्त झालेल्या शक्तींचा वापर करुन महाराष्ट्र शासन श्री. एस.व्ही.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांची अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका या पदावर दिनांक ०४.०७.२०१३ (म.पू.) पासून प्रतिनियुक्तीने नेमणूक करीत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sakharam Kharat

Digitally signed by Sakharam Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Kharat
Date: 2015.11.07 16:45:55 +05'30'

**(स.दि.खरात)**

**शासनाचे अवर सचिव**

**(शासन निर्णय न.वि.वि. क्रमांक बीएमसी-२५१५/प्र.क्र.१०५३/नवि-२१,**
**दिनांक ४ नोव्हेंबर, २०१५ सोबतचे सहपत्र)**

**परिशिष्ट - अ**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई या पदावरील सेवेच्या प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती पुढील प्रमाणे विहित करण्यात येत आहेत :-

१) **प्रतिनियुक्तीचा कालावधी** :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा हे दिनांक ४.७.२०१३ (म.पू) पासून वरील स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर असतील मात्र

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता बृहन्मुंबई महानगरपालिका यांना नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी ३ महिने अगोदार महानगरपालिकेने शासनास तसे कळविणे आवश्यक राहील.

२) **वेतन** :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा हे सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई हे पद धारण करतील.

सदर कालावधीत ते भारतीय प्रशासन सेवेतील वेतनश्रेणी पीबी-४, रु.३७४००-६७०००+श्रेणी वेतन रु.१००००/- मध्ये वेतन घेतील. त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबत आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून (का.९-अ) निर्गमित करण्यात येतील.

३) **महागाई भत्ता** :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा ह्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा अधिकाऱ्यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

४) **प्रतिनियुक्ती भत्ता:-** श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत शा.नि.सा.प्र.वि.क्र. भाप्रसे- ३०१३/३१२/२०१३/९. दि.११.०९.२०१३ अन्वये

निर्गमित केलेल्या तरतुदींनुसार दरमहा मूळ वेतनाच्या ५ टक्के/१० टक्के दराने प्रतिनियुक्ती भत्ता बृहन्मुंबई महानगरपालिका ही संस्था देईल. तसेच सदर कालावधीत त्यांना जरी त्यांच्या अंतिम वेतन प्रमाणपत्रातही तसे नमूद केले असले तरी त्यांना विशेष वेतन अनुज्ञेय असणार नाही.

५) **स्थानिक पूरक भत्ता :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना राज्य शासनाच्या नियमांनुसार/आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या दराने स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

६) **निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास साजेसे निवासस्थान बृहन्मुंबई महानगरपालिका देईल. तथापि, त्यांना योग्य असे निवासस्थान देवू शकत नसेल आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनयुिक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तरच ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेवू शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पाहिले ३ महिने त्यांना विहित सामान्य दराने व त्यानंतर आर्थिक दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञप्ती शुल्क व सेवाशुल्क भरणे आवश्यक आहे. बृहन्मुंबई महानगरपालिका प्रशासन नियमानुसार त्यांना भाडेरहीत तत्वावर निवासस्थान देय असेल तर त्याचा लाभ श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा बृहन्मुंबई महानगरपालिकेचे निवासस्थान नसेल तर त्यांना सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. भाप्रसे-१००८/प्र.क्र.२६२/०८/९, दि. २५.०२.२०१० नुसार तसेच त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या बदलानुसार घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

७) **पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळेच्या पदग्रहण अवधीमध्ये, त्यांचे वेतन व प्रवासभत्ता, श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास हे ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेले असतील त्या शासनाच्या नियमानुसार किंवा स्वीयेत्तर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असतील त्या शासनाच्या नियमानुसार बृहन्मुंबई महानगरपालिका देईल.

८) <u>प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरीता प्रवास भत्ता</u> :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणाऱ्या प्रवासांकरीता राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा संस्थेच्या नियमान्वये यांपैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशीर असतील त्या नियमांनुसार प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

९) <u>रजा</u> :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) सेवानियम, १९५५ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीचा कालावधीत त्यांना नैमित्तीक रजा व्यतिरिक्त इतर रजा मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग, का-१०) सक्षम असेल. स्वीयेत्तर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाच्या व कोणत्याही स्थानिक पुरक भत्त्यावरील संपूर्ण खर्च बृहन्मुंबई महानगरपालिकेला सोसावा लागेल.

१०) <u>विकलांगता रजेबद्दल रजा वेतन</u> :-

स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणाऱ्या रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुध्दा रजा वेतन देण्यास बृहन्मुंबई महानगरपालिका जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च बृहन्मुंबई महानगरपालिका उपक्रमाकडून वसूल करण्यात येईल.

११) <u>रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदाने</u> :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्याबाबत रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान हे शासन परिपत्रक क्र.भाप्रसे-१४१३/प्रक्र.२२०/२०१३/९-अ, दि.१२.२.२०१४ मध्ये नमुद मार्गदर्शक सूचनांनुसार शासनाने (सामान्य प्रशासन विभाग) कळविलेल्या दराने बृहन्मुंबई महानगरपालिका शासनाकडे (सामान्य प्रशासन विभाग/का.९-अ) प्रत्येक आथिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या किंवा जर स्वीयेत्तर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त होत असेल तर स्वीयेत्तर सेवेच्या अखेरीस भरणा करील. ह्या रकमा दोन वेगवेगळया डिमांड ड्राफ्टद्वारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा) सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/का.९-अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे आवश्यक असेल. सदर डिमांड ड्राफ्टस् बृहन्मुंबईतील कोणत्याही अनुसूचित बँकेचे सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग/का.९-अ, मंत्रालय, मुंबई या नावे काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

**अ)** **<u>रजा वेतन</u> :-** "००७० इतर प्रशासकीय सेवा-६० इतर सेवा-८००-इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयोत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत. त्यांच्याबाबत रजावेतन अंशदान (००७०००११६)"

**ब)** **<u>निवृत्तीवेतन अंशदान</u> :-** "००७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्त लाभ यांच्या वसूलीसंबंधातील अंशदाने वसूलीच्या रकमा-०१-नागरी-१०१ -अभिदाने अंशदाने (एक) स्वीयेत्तर सेवा अधिकारी (००७१००१२)"

टिप-प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील उपरोक्त रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास विलंब कालावधीत दंडात्मक व्याज भरण्यास बृहन्मुंबई महानगरपालिका जबाबदार राहील.

**१२) <u>नैमित्तिक रजा</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना प्रतिनयिुक्तीच्या कालावधील राज्य शासनाच्या नियमानुसारच नैमित्तिक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास, आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका हे सक्षम असतील.

**१३) <u>रजा प्रवास सवलत:-</u>**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भा.प्र.से. यांना अ.भा. से. (रजा प्रवास सवलत) नियम, १९७५ मधील तरतूदींनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. याबाबतचा खर्च बृहन्मुंबई महानगरपालिकेस सोसावा लागेल. त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तीक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि./का.१०) सक्षम असेल. (शासन परिपत्रक सा.प्र.वि. भाप्रसे-२१०५/७४/२००५/९ दि.०६.१२.२००५) तसेच नैमित्तीक रजेच्या कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका हे सक्षम असतील.

**१४) <u>वैद्यकीय सवलती:-</u>**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भा.प्र.से. यांना अ.भा. से. (वैद्यकीय देखभाल) नियम, १९५४ मधील तरतूदींनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च बृहन्मुंबई महानगरपालिकेस सोसावा लागेल. मात्र त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ ते घेऊ इच्छित असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल.

(शा.नि.सा.आ.वि.२००५/९/१/आ.३, दि.१९.०३.२००५ व शा. नि. सा. आ. वि. २०११/ ३३/ ११/ राकावि-२ दि.१६.११.२०११).

**१५) <u>भविष्य निर्वाह निधी:-</u>**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भा.प्र.से. यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अ.भा. से. (भविष्य निर्वाह निधी) नियम, १९५५ मधील तरतुदींनुसार, भविष्य निर्वाह निधीची वार्षिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. ही वर्गणी ८००९-राज्य भविष्य निर्वाह निधी-०१-नागरी-१०४ अखिल भारतीय सेवा भविष्य निर्वाह निधी ८००९-५०३-९ या लेखाशिर्षाखली जमा दर्शविण्यात यावी. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यापैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नावे काढून भविष्य निर्वाह निधी अनूसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा.

प्रतिनियूक्तीच्या कालावधीत त्यांना त्यांच्या भविष्य निर्वाह निधी खात्यातून परतावा/ प्राप्त/ना-परतावा अग्रिम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असल्यामुळे याबाबतचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग/का.९, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावेत.

**१६) <u>विभागीय चौकशी</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्याविरुध्द विभागीय चौकशीबाबत अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम, १९६९ हे नियम लागू असतील, प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी करावयाची असेल तर त्यांना शासनसेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना शासनाने निलंबित केल्यास निलंबनाधीन कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देईल. मात्र निर्वाह भत्त्याची रक्कम बृहन्मुंबई महानगरपालिकेकडून वसुल करण्यात येईल.

**१७) <u>बोनस किंवा सानुग्रह अनुदान</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही. बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असले तरी त्यांना स्विकारता येणार नाही.

**१८)<u>गटविमा योजना</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या वेतनातून दरमहा रु.१२०/- इतकी रक्कम केंद्र शासकीय कर्मचारी गटविमा योजनेच्या वर्गणीपोटी बृहन्मुंबई महानगरपालिका दरमहा वसूल करील ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व

अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल. या रक्कमेच्या वसुलीचे विवरण सहायक संचालक, सामान्य प्रशासन विभाग/९-अ, मंत्रालय यांच्याकडे पाठविण्यात यावे.

(केंद्र शासकीय कर्मचारी गटविमा सदस्यांबाबत) (८६५८-सस्पेनस अकाऊंटस-१२३ ऑल इंडिया सर्व्हिसेस ऑफिसर्स ग्रुप इन्शुरन्स स्कीम-रिकव्हरीज टुवर्डस, सेंट्रल गव्हर्नमेंट एम्प्लॉईल ग्रुप इन्शुरन्स स्कीममेउ ॲम्लीकेबल टू आयएएस ऑफिसर्स बॉर्न ऑफ दि महाराष्ट्र केडर-सबस्क्रीप्शन आयएएस (८६५८-८६२-८) या शीर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी.

**१९) <u>मोटार कार</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी बृहन्मुंबई महानगरपालिका वाहन उपलब्ध करुन देईल. सदर वाहनांचा खाजगी वापर पुढील अटीच्या अधिनतेने त्यांना करता येईल.

(अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलोमीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहित करण्यात येणाऱ्या दराने भाडे संस्थेस द्यावे लागेल.

(ब) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. टीआर-१०९०/सीआर-३२०/९०/एसईआर-५, दिनांक १७.१२.१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधीत आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणा ही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

**२०) <u>कर्ज आणि अग्रीम</u> :-**

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत भविष्य निर्वाह निधी परतावा प्राप्त / ना-परातावा अग्रीम, घरबांधणी अग्रीम, मोटारकार अग्रीम, वैयक्तीक संगणक अग्रीम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असेल याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, का-९, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. बृहन्मुंबई महानगरपालिकेने त्यांना सदर अग्रीम मंजूर करु नयेत.

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना महाराष्ट्र शासनाकडून यापुर्वीच घर बांधणी अग्रीम मंजुर करण्यात आले असल्यास व त्याची वसुली असल्यास बृहन्मुंबई महानगरपालिकेने त्यांच्या वेतनातुन दरमहा वसुली करुन त्या रकमा धनादेशाद्वारे महाराष्ट्र कोषागार नियमातील नमुना क्र. ५५ मध्ये माहिती भरुन त्या नमुन्यासह पुढील महिन्यात सहाय्यक संचालक (लेखा) ९-अ मंत्रालय, मुंबई यांचेकडे पाठवावी. धनादेश सहाय्यक संचालक, (लेखा), सामान्य प्रशासन विभाग, ९-अ, मंत्रालय, मुंबई या नावाने काढण्यात यावा.

२१) <u>प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती</u> :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा हे प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेले किंवा प्रशिक्षणासाठी गेले आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजावेतन, वेतन, पदग्रहण अवधी सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत बृहन्मुंबई महानगरपालिका सोसेल.

<u>२२) निवासी शिपायाऐवजी रोख परतावा</u> :-

बृहन्मुंबई महानगरपालिकेने प्रतिनियुक्तीच्या कालावधीत श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांच्या निवास स्थानी शिपाई दिला नसल्यास व श्री.श्रीनिवास यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायाऐवजी रोख परतावा अनुज्ञेय असल्यास किंवा बृहन्मुंबई महानगरपालिका अधिकाऱ्यांना निवासी शिपायाऐवजी रोखपरतावा अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल. मात्र, असा परतावा घेण्यापूर्वी संबंधित अधिकाऱ्याच्या निवासस्थानी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र संबंधित अधिकाऱ्यांना देणे आवश्यक राहील.

<u>२३) शासनाने वेळोवेळी विहित केलेल नियम लागू करणे</u> :-

श्री.एस.व्ही.आर.श्रीनिवास, भारतीय प्रशासन सेवा यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम / कार्यकारी आदेश लागू असतील.

<u>२४) प्रतिनियुक्ती कालावधीत देशात /परदेशात प्रवास</u> :-

बृहन्मुंबई महानगरपालिकेमध्ये प्रतिनियुक्तीवर असताना, बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र, बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, अथवा खाजगी कामांसाठी परदेशी जावयाचे असल्यास शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहिल.

**२५) विहित अटी व शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी/शर्तीबाबत :-**

वर नमूद केलेल्या अटी/शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी/शर्तीबाबत महाराष्ट्र शासन, संबर्गातील अधिकाऱ्यांना जे नियम विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश लागू असतील.

Sakharam Kharat

Digitally signed by Sakharam Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb1cb39de10fe09852a24a5fa63add6d5b204146d3716e740e20fb4b2a378a55, cn=Sakharam Kharat
Date: 2015.11.07 16:46:27 +05'30'

**(स.दि.खरात)**
शासनाचे अवर सचिव